महिन्याचा पहिला शनिवार हा "टेक सॅटरडे'" म्हणून साजरा करणे. (First Saturday Tech Saturday Campaign )

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

शासन परिपत्रक क्रमांक मातंसं / प्र. क्र.257/39

मंत्रालय, मुंबई 400 032

दिनांक: 05 ऑक्टोबर, 2011

**परिपत्रक**

मंत्रालयातील अधिकारी व कर्मचाऱ्यांना माहिती तंत्रज्ञानाचा वापर आपल्या दैनंदिन प्रशासकीय कामकाजात प्रभावीपणे करण्याची आवड निर्माण व्हावी आणि माहिती तंत्रज्ञान क्षेत्रातील नवनवीन उपकरणे, सॉफ्टवेअर इत्यादी बाबींची माहिती व्हावी, या उद्देशातून राज्य सेतू सोसायटीमार्फत प्रत्येक महिन्याच्या पहिल्या शनिवारी "टेक सॅटरडे" या कार्यक्रमाचे आयोजन करण्यात यावे, असा ठराव राज्य सेतू सोसायटीने आपल्या सन 2010-11 च्या वार्षिक सर्वसाधारण सभेत मंजूर केला आहे. या कार्यक्रमात माहिती तंत्रज्ञान क्षेत्रातील विविध कंपन्यांना, एक्सपर्ट तंत्रज्ञांना सहभागी करुन घेण्यात यावे व ते अत्याधुनिक तंत्रज्ञान आणि उत्पादने यांची माहिती प्रदर्शन, चर्चासत्र इ. माध्यमातून देतील.

या कार्यक्रमांतर्गत तंत्रज्ञान विषयावर आधारित स्पर्धा आयोजित करण्यात यावी. ही स्पर्धा सर्व शासकीय आणि स्थानिक स्वराज्य संस्थांच्या अधिकारी / कर्मचाऱ्यांसाठी खुली राहील. स्पर्धेतील विजेत्यांना कंपन्याकडून उत्तेजनार्थ बक्षिसे दिली जावीत. असेच कार्यक्रम जिल्हा सेतू सोसायटी यांनी त्यांच्या जिल्हयांमध्ये विविध ठिकाणी आणि विविध विभागांमध्ये आयोजित करावेत.

प्रत्येक जिल्हयातील विविध विभागांमध्ये संगणकावर काम करण्याकरिता अनेक अधिकारी / कर्मचारी इच्छुक असतात. जिल्हाधिकारी यांनी अशा अधिकारी कर्मचाऱ्यांमधून 10 ते 50 कर्मचारी शोधून त्यांना संगणक क्षेत्रातील तज्ञ व्यक्तींकडून मार्गदर्शन / प्रशिक्षण देऊन प्रशिक्षित करावे. मंत्रालयात सदरचा उपक्रम माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने सर्व विभागांसाठी हाती घ्यावा. अशा अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या ग्रुपमधील विशेष प्राविण्य प्राप्त करणाऱ्या अधिकारी /कर्मचाऱ्यांना राज्यस्तरावर शासनाकडून घेण्यात येणाऱ्या स्पर्धांमध्ये भाग घेता येईल किंवा त्यांना अत्याधुनिक तंत्रज्ञानाबाबतच्या कार्यशाळा / चर्चासत्र / प्रशिक्षण यासाठी पाठविण्यात यावे.

विविध प्रकल्पांसाठी आणि ट्रेनिंगमध्ये त्यांचा Technology Champions म्हणून वापर करावा. त्यांपैकी इच्छुक अधिकारी / कर्मचाऱ्यांना राज्यस्तरावर काम करण्याची संधी माहिती तंत्रज्ञान विभाग उपलब्ध करून देईल आणि त्यांच्या ज्ञानाचा उपयोग शासनस्तरावर माहिती तंत्रज्ञान क्षेत्रात प्रगती करण्याकरिता करुन घेण्यात येईल. सदरचा उपक्रम यशस्वी करण्यासाठी सर्व संबंधित अधिकारी यांनी स्वतः लक्ष घालावे.

हा सर्व खर्च राज्य सेतू सोसायटी आणि जिल्हा सेतू सोसायटीमधून करण्यात यावा.

संगणक संकेतांक 201110071658490001

(रत्नाकर गायकवाड)

**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव

सर्व विभागीय आयुक्त

सर्व जिल्हाधिकारी

सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी ( जिल्हा परिषद )